**महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळास मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**मराठी भाषा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः विकोश-२०११/प्र.क्र.१६/भाषा-२**
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२
दिनांक: २४ एप्रिल, २०१५

**वाचा:-**

१) सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग शासन निर्णय क्र.विनिमं- २००५ /प्र.क्र.१/सां.का.२, दिनांक ०९.१२.२००५
२) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाचा शासन निर्णय क्र.विनिमं-२००८/प्र.क्र.(२७४)/२००८/सां.का.२, दिनांक ०९.०६.२००९
२) मराठी भाषा विभाग शासन निर्णय क्र. विकोश-२०११/प्र.क्र.१६/भाषा-२, दि. १२ फेब्रुवारी, २०१५

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळाच्या पुर्नरचना संदर्भ क्र.१ व २ येथील शासन निर्णयान्वये करण्यात आली होती. महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळाची पुनर्रचना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन असल्याने अस्तित्वात असलेले मराठी विश्वकोश निर्मिती मंडळाचे अध्यक्ष व सदस्य यांची नियुक्ती समक्रमांक दिनांक १२ फेब्रुवारी, २०१५ अन्वये रद्द करण्यात आली होती.

प्रस्तुत प्रकरणी पुनर्विचाराअंती दिनांक १२ फेब्रुवारी, २०१५ च्या शासन निर्णयान्वये दिलेले आदेश रद्द करण्यात येत असून मराठी विश्वकोश निर्मिती मंडळाचे अध्यक्ष व सदस्य यांची नियुक्ती दि.१२.२.२०१५ पासून माहे जून, २०१५ पर्यंत सुरू ठेवण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४२४१५३८०७०१३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Aparna Arvind Gawde

Digitally signed by Aparna Arvind Gawde
DN: CN = Aparna Arvind Gawde, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.04.24 15:51:19 +05'30'

**अपर्णा गावडे**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, प्रभादेवी, मुंबई.
२) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, प्रभादेवी, मुंबई.
३) मंडळाचे सर्व सदस्य (सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ यांचेमार्फत)
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

५) महालेखापाल, महाराष्ट्र १ (लेखा परिक्षा /लेखा अनुज्ञेयता), मुंबई,
६) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
७) महालेखाकार (स्थानिक निकाय लेखापरिक्षा व लेखा) , महाराष्ट्र , मुंबई
८) मा.मंत्री, मराठी भाषा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
९) वित्त विभाग (व्यय-४/सेवा-५/विनियम), मंत्रालय, मुंबई
१०) निवडनस्ती